राज्यातील मध्यवर्ती कारागृहामध्ये मोबाईल जामर यंत्रणा

खरेदी समिती गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्र. एमएजे-०१२१/६/(१२६)/पीआरएस-२,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक : २३ जुलै २००४.

वाचा : १) कारागृह उप महानिरीक्षक (मुख्यालय),पुणे यांचे क्र.बीएलडी/मुंमका/जॅमर/२००१/क.६, दिनांक २१ मे २००३ चे पत्र.

२) सह सचिव, गृह विभाग यांचे क्र. एसयुपी-११०३/पु.मा.(पावसाळी अधिवेशन) सीआर-४०/बीयुडी-१, दिनांक ५ ऑगस्ट २००३ चे पत्र.

३) शासन निर्णय, क्र. एमएजे-०१२१/६/(१२६)/पीआरएस-२, दिनांक १९ ऑगस्ट २००३.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्रातील कारागृहामध्ये विशेष करुन मुंबई, ठाणे, कल्याण, पुणे व नाशिक या मध्यवर्ती कारागृह येथील विविध प्रकारच्या गँगचे गँगवार बंदी व अतिरेकी संघटनेचे खतरनाक बंदी बंदिस्त आहेत. त्यामुळे बंदिस्त बंद्यांना त्यांचे नातेवाईक व गुन्हेगार चौकडी हे बंद्याच्या मुलाखतीसाठी आल्यावर संपर्क साधतात व त्यातील काही बंदी कारागृहाच्या आंतमध्ये गैरमार्गाने मोबाईल फोन मिळवून त्याद्वारे घातपाती कारवाया, खंडणी वसुली, धमकी देणे अशा प्रकारचे संभाषण करण्याचा प्रयत्न करत असतात. अशा स्वरुपाचे सेल/मोबाईल फोनवरुन संपर्क साधणे हे कारागृह प्रशासनाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने अत्यंत धोकादायक आहे. त्यामुळे त्यावर नियंत्रण ठेवण्याची नितांत आवश्यकता आहे. आधुनिक तंत्रज्ञानामध्ये दिवसेंदिवस बदल होत असल्याने देशामध्ये यापुढे मोबाईलच्या अनेक ध्वनीलहरी येण्याची शक्यता आहे. त्यामुळे सध्या कार्यान्वित असलेल्या सेल/मोबाईल फोनच्या ध्वनीलहरींचा समावेश असणे आणि यापुढे नवीन निर्माण होणा-या ध्वनीलहारींचाही मोबाईल जामरमध्ये समावेश असणारे अद्ययावत यंत्र/ उपकरण घेणे आवश्यक आहे व असे अद्ययावत यंत्र /उपकरण खरेदी करण्याबाबत यापूर्वीच शासन निर्णय दिनांक १९ ऑगस्ट २००३ अन्वये मान्यता देण्यात आली होती.

२.	वर नमूद केलेल्या परिस्थितीत राज्यातील मध्यवर्ती कारागृहांमध्ये व इतर कारागृहांमध्ये मोबाईल जामर यंत्र / उपकरण खरेदी करण्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव (गृह) | - अध्यक्ष |
| २) | प्रधान सचिव (तुरुंग) | - सदस्य |
| ३) | प्रधान सचिव (उद्योग) | - सदस्य |
| ४) | प्रधान सचिव (वित्त) | - सदस्य |
| ५) | सचिव (सार्वजनिक बांधकाम) | - सदस्य |
| ६) | सचिव (माहिती तंत्रज्ञान) | - सदस्य |
| ७) | पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य | - सदस्य |
| ८) | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई | - सदस्य |
| ९) | महाव्यवस्थापक, एमटीएनएल (श्री.अरुणकुमार सक्सेना) | - सदस्य |
| १०) | उप महाव्यवस्थापक, बीएसएनएल ( श्री. अरविंद पाण्डेय ) | - सदस्य |
| ११) | कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य | - सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे :-

१) सदर जामरचा तांत्रिक नमुना (Technical Specification) निश्चित करणे.
२) खरेदी निविदा अंतिम करणे.

सदर समितीच्या बैठका अध्यक्षांच्या निर्देशानुसार आयोजित करण्यात याव्या.

( किरण ठाकूर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई,
अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव (तुरुंग),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव (उद्योग),उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई

सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव (माहिती तंत्रज्ञान), माहिती तंत्रज्ञान विभाग,मंत्रालय,मुंबई
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
महाव्यवस्थापक, एमटीएनएल,मुंबई
उपमहाव्यवस्थापक,बीएसएनएल,मुंबई
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र१/२ (लेखा परीक्षा),मुंबई, नागपूर
निवडनस्ती (पीआरएस-२)